राज्यात माहे ऑक्टोबर-नोव्हेंबर २०१९ मध्ये "क्यार" व "महा" चक्रिवादळामुळे झालेल्या अवेळी पावसामुळे शेतीपिकाच्या नुकसानीपोटी बाधित शेतकऱ्यांना विशेष दराने मदत देण्यासाठी आकस्मिकता निधीतून रक्कम वितरित करण्याबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- सीएलएस २०१९/प्र.क्र.१९१/म-३**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १३ डिसेंबर, २०१९

वाचा : १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. सीएलएस -२०१५/प्र.क्र.४०/म-३,दि. १३.०५.२०१५
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग , समक्रमांक, दि. १८.११.२०१९
३) वित्त विभाग, ज्ञापन क्रमांक :आकनि - २०१९/प्र.क्र. २ /अर्थ-६, दिनांक १२.१२.२०१९

**प्रस्तावना:-**

राज्यात माहे ऑक्टोबर-नोव्हेंबर २०१९ मध्ये "क्यार" व "महा" चक्रिवादळामुळे निर्माण झालेल्या परिस्थितीमुळे झालेल्या अवेळी पावसामुळे राज्यातील ३४ जिल्ह्यातील ३४९ तालुक्यांमधील शेतीपिकांचे नुकसान झाल्याचे निदर्शनास आले आहे. सदर नैसर्गिक आपत्तीमुळे शेतीपिकांचे नुकसान झाल्याने बाधित झालेल्या शेतकऱ्यांना मदत देण्यासाठी संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये रू २०५९३६.६५ लाख इतका निधी वितरित करण्यास मान्यता देण्यात आली आहे. तसेच सदर निधी दिनांक १९.११.२०१९ रोजी बीम्स प्रणालीवर वितरित देखील करण्यात आला आहे. सदर वितरित निधी बाधित शेतकऱ्यांना वाटप करण्याची कार्यवाही क्षेत्रीय स्तरावर सुरू आहे. आता या प्रयोजनासाठी वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक ३ येथील ज्ञापनान्वये आकस्मिकता निधीतून मंजूर झालेला रू ४५००००.०० लक्ष ( रूपये चार हजार पाचशे कोटी फक्त) इतका निधी पुढील हप्त्यापोटी क्षेत्रीय स्तरावर वितरित करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

माहे ऑक्टोबर-नोव्हेंबर २०१९ मध्ये "क्यार" व "महा" चक्रिवादळामुळे निर्माण झालेल्या परिस्थितीमुळे झालेल्या अवेळी पावसामुळे राज्यातील ३४ जिल्ह्यांतील ३४९ तालुक्यांमधील शेतीपिकांचे व बहुवार्षिक पिकांचे नुकसान झाले आहे. सदर आपत्तीमुळे शेतीपिकांचे व बहुवार्षिक पिकांचे नुकसान झालेल्या आपद्ग्रस्त शेतकऱ्यांना पुढीलप्रमाणे विशेष दराने मदत देण्याचा निर्णय शासनाने संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये घेतला आहे:

**(अ) मदत - शेतीपिकांचे व बहुवार्षिक पिकांचे नुकसान**

| बाब | आर्थिक सहाय्याचे दर |
|---|---|
| अ) शेतीपिके | रु.८,०००/- प्रति हे. |
| ब) बहुवार्षिक पिके (फळबागा) | रु.१८,०००/- प्रति हे. |

शेतीपिके/ फळपिकांच्या नुकसानीसाठी २ हेक्टरच्या मर्यादेपर्यंत उपरोक्त मदत अनुज्ञेय राहील.

२. उपरोक्त परिच्छेदामध्ये नमूद केल्याप्रमाणे बाधित शेतकऱ्यांना मदतीचे वाटप करण्यामध्ये बाधा येऊ नये यासाठी संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन ज्ञापनान्वये या विभागास आकस्मिकता निधीतून मंजूर करण्यात आलेला रू. ४५००००.०० लक्ष (रूपये चार हजार पाचशे कोटी फक्त) इतका निधी या शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्रात नमूद केल्याप्रमाणे जिल्हयांना उपलब्ध करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. शेती व फळ पिकाच्या नुकसानीसाठी मदतीचे वाटप करताना खालीलप्रमाणे दक्षता घेण्यात यावी.

i) प्रचलित नियमानुसार शेती / बहुवार्षिक फळपिकाच्या नुकसानीकरीता मदत ३३ टक्के अथवा त्याहून अधिक नुकसान झालेल्यांना अनुज्ञेय राहील.

ii) प्रचलित पध्दतीनुसार कृषी सहायक, तलाठी व ग्राम सेवक यांच्या संयुक्त स्वाक्षरीने पूर्ण करण्यात आलेल्या पंचनाम्यानुसार सर्व जिल्हाधिकारी यांनी दिलेल्या अहवालानुसार विभागीय आयुक्त यांनी आयुक्त (कृषि) यांना पाठविलेल्या व कृषि आयुक्त यांनी राज्याचा अहवाल एकत्रित करून शासनास सादर करण्यात आलेल्या अहवालानुसार मदतीचे वाटप जिल्हाधिकारी यांनी करावे.

iii) **शेतीपिकांच्या नुकसानीसाठी मदतीची किमान रक्कम रू १०००/- तसेच बहुवार्षिक पिकांसाठी मदतीची किमान रक्कम रू २०००/- अनुज्ञेय राहील**.

iv) संबंधित बाधितांच्या बँक बचत खात्यात मदतीची रक्कम थेट जमा करण्यात यावी.

v) कोणत्याही बाधितांना रोखीने किंवा निविष्ठा स्वरुपात मदत करण्यात येऊ नये

vi) शेत जमिनीच्या झालेल्या नुकसानीकरीता मदतीची रक्कम खातेदारांच्या बँक खात्यावर थेट जमा करताना मदतीच्या रक्कमेमधून कोणत्याही बँकेने कोणत्याही प्रकारची वसुली करु नये. याकरिता सहकार विभागाने योग्य ते आदेश निर्गमित करावेत.

vii) सदर निर्णयान्वये शेतकऱ्यांना देण्यात येणारी मदत ही विशेष बाब असल्यामुळे पूर्वोदाहरण म्हणून गणली जाणार नाही.

४. विभागीय आयुक्त यांनी आकस्मिकता निधीमधून रक्कम खर्च करण्याच्या आहरण व संवितरण अधिकाऱ्याकडे रक्कम सुपुर्द करण्यासंबंधीच्या आदेशात/पत्रात आगाऊ रकमेतून खर्च करताना कोषागारात सादर करण्यात येणाऱ्या देयकावर " **आकस्मिकता निधी अग्रीम वित्त विभाग, ज्ञापन क्रमांक आकनि-२०१९/ प्र.क्र.२/अर्थ-६, दिनांक १२.१२.२०१९ अन्वये मंजूर " असे लाल शाईने लिहावे अशा स्पष्ट सुचना नमूद करण्यात याव्यात. ही सुचना लाल शाईने अधोरेखित करावी.**

५. सदर प्रकरणी पुरक अनुदान प्राप्त झाल्यावर करण्यात आलेला खर्च मागणी क्रमांक सी-६, प्रधान लेखाशीर्ष २२४५- नैसर्गिक आपत्तीच्या निवारणार्थ सहाय्य, ०२, पूर, चक्रीवादळे इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१)(०५) नैसर्गिक आपत्तीमुळे पीक नुकसानीकरिता शेतकऱ्यांना मदत, ३१ सहाय्यक अनुदाने ( २२४५ २४५२) या लेखाशीर्षाखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा. याकरिता आकस्मिकता निधी संकेतांक (८००० ७५८३) असा आहे. सदर निधी विभागीय आयुक्त यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर आकस्मिकता निधी अंतर्गत वितरित करण्याची कार्यवाही कार्यासन म-११, मदत व पुनर्वसन प्रभाग यांनी करावी.

**६.** सदर आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक: ४२६/२०१९/व्यय-९,दिनांक २७.११.२०१९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१९१२१३१३२४०७७६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3da afe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308 b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2019.12.13 13:30:14 +05'30'

**( सुभाष उमराणीकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (सर्व मंत्रालयीन विभाग),
३. विभागीय आयुक्त (सर्व)
४. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे
५. जिल्हाधिकारी (सर्व)
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
७. महालेखापाल (लेखा परीक्षण), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
८. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
९. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१०. सह सचिव (कार्यासन म-११), मदत व पुनर्वसन विभाग, मंत्रालय,मुंबई यांना बीम्स प्रणालीवर निधी वितरित करण्याच्या विनंतीसह अग्रेषित
११. कार्यासन अधिकारी , कार्यासन( अर्थसंकल्प-६/व्यय-९) वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
१२. कार्यासन अधिकारी, कार्यासन (१०-अे/१३-अे), कृषी विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. निवडनस्ती म-३ कार्यासन.

**शासन निर्णय, महसुल व वन विभाग, क्रमांक- सीएलएस २०१९/प्र.क्र.१९१/म-३ ,**
**दिनांक : १३ डिसेंबर, २०१९ चे विवरणपत्र**

| अ.क्र. | जिल्हा | शासन निर्णय दि. १९.११.२०१९ अन्वये वितरित केलेला पहिल्या टप्प्याचा निधी (रू लाखात) | या शासन निर्णयान्वये वितरित करण्यास मान्यता देण्यात येत असलेला आकस्मिकता निधी (रू लाखात) |
|---|---|---|---|
| १ | ठाणे | ८२०.६८ | १७९२.९८ |
| २ | पालघर | ९७३.०८ | २१२६.५२ |
| ३ | रायगड | ५१७.१४ | ११३०.०४ |
| ४ | रत्नगिरी | ५०१.३६ | १०९५.७६ |
| ५ | सिंधुदुर्ग | ६६५.०९ | १४५३.४९ |
| **कोकण विभाग** | | **३४७७.३५** | **७५९८.७९** |
| ६ | नाशिक | १८१५०.८४ | ३९६६२.४५ |
| ७ | धुळे | ७४८७.२२ | १६३६०.५१ |
| ८ | नंदुरबार | ११३.७६ | २४८.४५ |
| ९ | जळगांव | १७९९८.०१ | ३९३२६.०२ |
| १० | अहमदनगर | १३५५५.०९ | २९६२०.१३ |
| **नाशिक विभाग** | | **५७३०४.९२** | **१२५२१७.५६** |
| ११ | पुणे | ३९५५.९५ | ८६४४.५२ |
| १२ | सोलापूर | ५८१५.१ | १२७०७.०३ |
| १३ | सातारा | १७५७.५७ | ३८४०.१३ |
| १४ | सांगली | ३४४८.४२ | ७५३४.९३ |
| १५ | कोल्हापूर | ३८.६५ | ८४.२० |
| **पुणे विभाग** | | **१५०१५.६९** | **३२८१०.८१** |
| १६ | औरंगाबाद | १२१८१.०९ | २६६१७.७३ |
| १७ | जालना | ११०२१.९९ | २४०८४.७९ |
| १८ | बीड | १४४१८.८३ | ३१५०७.४५ |
| १९ | लातूर | १००६८.०२ | २२०००.१२ |
| २० | उस्मानाबाद | ७८१९.५८ | १७०८७.४१ |
| २१ | नांदेड | १२३१४.२३ | २६९०८.६७ |
| २२ | परभणी | ८७६२.७३ | १९१४८.३२ |
| २३ | हिंगोली | ५३७६.६१ | ११७४८.६१ |
| **औरंगाबाद विभाग** | | **८१९६३.०८** | **१७९१०३.१०** |
| २४ | बुलढाणा | १३६१३.९१ | २९७४८.७८ |
| २५ | अकोला | ७२५५.७७ | १५८५४.८१ |
| २६ | वाशिम | ५६५१.२ | १२३४८.५८ |
| २७ | अमरावती | ७२४०.९३ | १५८२२.३३ |
| २८ | यवतमाळ | १०१९६.३३ | २२२८०.४२ |
| **अमरावती विभाग** | | **४३९५८.१४** | **९६०५४.९२** |

| | | | |
|---|---|---|---|
| २९ | वर्धा | ४०.२५ | ८८.०७ |
| ३० | नागपूर | १३३६.९३ | २९२१.१८ |
| ३१ | भंडारा | २८७.८ | ६२८.६२ |
| ३२ | गोंदिया | २६६.०७ | ५८१.१९ |
| ३३ | चंद्रपूर | १९४५.७५ | ४२५१.६५ |
| ३४ | गडचिरोली | ३४०.६७ | ७४४.११ |
| **नागपूर विभाग** | | **४२१७.४७** | **९२१४.८२** |
| **एकूण राज्य** | | **२०५९३६.६५** | **४५००००.००** |